निवडसूची सन २०१७-१८ अनुसार "पोलीस उप अधीक्षक/ सहा. पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" पदावर पदोन्नतीने सुधारित पदस्थापना करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्र. रापोसे-१७२१/प्र.क्र.२५२/पोल-१अ.

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ** :- शासन आदेश, गृह विभाग, क्र. रापोसे-०११७/प्र.क्र.२५८/पोल-१अ, दिनांक ०८.०६.२०१८.

**शासन आदेश.**

"पोलीस निरीक्षक (नि:शस्त्र)" या पदावरुन "पोलीस उप अधीक्षक/ सहा. पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या निवडसूची सन २०१७-१८ मध्ये समाविष्ट असलेले श्री. नितीन सुदामराव जगताप, पोलीस निरीक्षक (नि:शस्त्र), यांना, संदर्भाधीन शासन आदेशाद्वारे, उप विभागीय पोलीस अधिकारी, वर्धा उप विभाग, जिल्हा- वर्धा, या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती.

२. तथापि, श्री. नितीन सुदामराव जगताप हे उप विभागीय पोलीस अधिकारी, वर्धा उप विभाग, या पदावर रुजू झाले नाहीत. ते दिनांक २९.०३.२०२१ रोजी उक्त पदावर रुजू होण्याकरिता पोलीस अधीक्षक, वर्धा, यांच्या कार्यालयात हजर होते, पण तेव्हा उक्त पद रिक्त नसल्याने त्यांना रुजू होता आले नाही.

३. आता, पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांची शिफारस विचारात घेऊन, महाराष्ट्र पोलीस अधिनियम (सन १९५१ चा २२) याच्या कलम २२न मधील तरतुदींनुसार श्री. नितीन सुदामराव जगताप यांना "सहायक पोलीस आयुक्त, नागपूर शहर" या पदावर, याद्वारे, सुधारित पदस्थापना देण्यात येत आहे.

४. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, म.रा., यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/ न्यायालय यांचे आदेश, निवडणुकीची आदर्श आचारसंहिता, कायदा व सुव्यवस्था, इत्यादी लक्षात घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

५. हा शासन आदेश, महाराष्ट्र पोलीस अधिनियम याच्या कलम २२न मध्ये निर्दिष्ट आणि शा.नि., गृह विभाग, क्र.आयपीएस-२०२१/प्र.क्र.१८६/पोल-१, दिनांक १३.०८.२०२१, यामध्ये नमूद सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२४२०२७३२०१२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2021.12.24 20:30:21 +05'30'

**(व्यंकटेश भट)**
**शासनाचे सह सचिव.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. गृह मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.

**प्रत-**

१) पोलीस आयुक्त, नागपूर शहर.
२) पोलीस अधीक्षक, वर्धा.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/ नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५) श्री. नितीन सुदामराव जगताप *(पोलीस महासंचालक, म.रा., यांच्यामार्फत).*
६) निवड फाईल, पोल-१अ.